ळेना ॥ माझामीमजमाजींपूर्णपणा ॥ तिहींकाळींनव्हेअधिकउणा ॥ जैसातै-सासहज ॥ २५ ॥ अनंतब्रह्मांडेंमाझियेपोटीं ॥ मजमाजींसर्वांचीराहटी ॥ आ-णिसर्वांमाजींमाझीचदाटी ॥ निर्विकारत्वेंपूर्ण ॥२६॥ ऐसामीएकपणेंविणएकला ॥ समष्टिरूपेंसर्वात्मासंचला ॥ अनुभूतीविणआपआपणाला ॥ आपुलेपणेंअसें ॥ ॥ २७ ॥ ऐसेंअनेकाप्रकारेंजैसेंजैसें ॥ जेंजेंआठवेलप्रसंगाऐसें ॥ तेंतेंचिंतावेंतैसें तैसें ॥ विस्मृतिनहोतां ॥ २८ ॥ मुख्यऐक्यत्वकदांनभंगावें ॥ नामरूपादिभेद नव्हावे ॥ मगस्मरेलत्यायुक्तीनेंस्मरावें ॥ ब्रह्मात्मत्वदृढव्हावया ॥ २९ ॥ ऐसाप्र-कारज्ञानियासहजगती ॥ अपैसाहोयतेचिसहजस्थिति ॥ परीबळेंकरणेंलागेसाध-काप्रतीं॥यारीतींब्रह्मचिंतनिका ॥ ३० ॥ ऐशीब्रह्मचिंतनिकाअल्पसांगितली ॥ या रीतींचसाधकेंपाहिजेसाधिली ॥ येथेंमानिसीलकींनबोलतांबोली ॥ तरीमौनेंचिं-तनघडे ॥ ३१ ॥ कवणासीजरीबोलणेंलागे ॥ अनेकधाव्यापारप्रसंगें ॥ तरीकैसें चिंतावेंलावववेगें ॥ तरीयेविषईंबोलूं ॥ ३२ ॥ ॥ पद ॥ तत्कथनं ॥ कवणासी जरीबोलणेंपडे ॥ तरीतेंचिकथनकरावेंकोडें ॥ ब्रह्मात्मत्वनविसरावेंरोकडें ॥ द्वैत-भावनुठतां ॥ ३३ ॥ नानादृष्टांतयुक्तीकडून ॥ बहुधाश्रुतीचेंघेऊनवचन ॥ तेंचि साधकाप्रतीकरावेंकथन ॥ ब्रह्मात्मऐक्यरूप ॥ ३४ ॥ सयुक्तिकदृष्टांताचीयोजना॥ श्रुतिअनुभवायोग्यसांगरचना ॥ करावीजेणेंसंतोषसाधुजना ॥ होयब्रह्मानुभवा-चा ॥ ३५ ॥ कवणेहीप्रकारेंद्वैतनुद्भवावें ॥ ब्रह्मात्मत्वचिसदृढदुणावे ॥ ऐसेंचिसदृ-

ष्टांतसर्वबोलावे ॥ अन्यत्यागावेंबाष्कळ ॥ ३६ ॥ दृष्टांताकारणेंब्रह्मांडविवरावें ॥
मनेंकल्पूनयुक्तसेयोजावे ॥ परीवक्तृत्वाचेंसाहित्यनभंगावें ॥ आणिविरोधहीनया-
वा ॥ ३७ ॥ मागीलप्रसंगींएकबोलिला ॥ दुजियाविषईंत्याविरोधआला ॥ ऐसें
नबोलावेंपूर्वापरनिरूपणाला ॥ एकरूपताअसावी ॥ ३८ ॥ साधकासीजयानिरूप-
णें ॥ अधिकाधिकसमाधानबाणे ॥ आणिपूर्णज्ञात्यासीसंतोषजेणें ॥ ऐसेंसांगबोलावें
॥ ३९ ॥ म्हणसीसाधककींज्ञात्यासीबोलतां ॥ ब्रह्मानुभवबोलावाजोतत्त्वतां ॥ परी
अन्यअज्ञानासीप्रसंगपडतां ॥ कैसेंबोलावें ॥४०॥ तरीअवधारींतयाअज्ञानासीं ॥
प्रसंगेंबोलावेंप्रस्ताविकासी ॥ ब्रह्मज्ञानहीकथितांसारांशीं ॥ बाधहीनाहीं ॥ ४१ ॥
तयासीमात्रनव्हेग्रहण ॥ नव्हेतरीव्यर्थजायनिरूपण ॥ परीस्वयेंआपुलेंतोंदृढस-
माधान ॥ दुणावेबोलतां ॥ ४२ ॥ तथापितयाअज्ञानजनासी ॥ बोलूंचिनयेसांग
स्थितिजैशी ॥ बोलणेंपडेतरीरूपकेंसी ॥ वर्णूनबोलावें ॥ ४३ ॥ तयासीतोकांहीं
नकळे ॥ आणिआपुलातरीस्वानुभवउफाळे ॥ मुख्यभलतैसेप्रसंगींऐक्यनिवळे ॥
तैसेंचवडावेंआपणा ॥ ४४ ॥ बहुधाअज्ञानासीसंवादन ॥ घडूंचनयेवेदांतनिरूपण ॥
तयापुरतेंतयासीबोलून ॥ उगेंमौनेंअसावें ॥४५॥ मुख्यज्ञात्यासीकिंवासाधकासी॥
बोलावेंसांगस्वानुभवासी ॥ अथवाबोधावेंअधिकारीमुमुक्षूसी ॥ प्रबोधशक्तीच्या
बळें ॥४६॥ मुख्यमिळतांप्रतीतीचासंत ॥ तोतरीएकांतापरीसएकांत ॥ तेथेंनिःशं-
कबोलावेंयथायुक्त ॥ गोप्यतेंही ॥ ४७ ॥ ॥ पद ॥ अन्योन्यंतत्प्रबोधनं ॥ आपण

तयासीस्पष्टबोलावें ॥ नातरीतयाचेंनिरूपणऐकावें ॥ ऐसेंपरस्परेंप्रबोधनघडावें ॥ जेणेंदुणावेसमाधान ॥ ४८ ॥ प्रबोधनम्हणिजेबोधआपुला ॥ प्रकर्षेंपाहिजेदुणावला ॥ ऐसाचिपाहिजेसंवादजाहला ॥ उभयपक्षींही ॥ ४९ ॥ आपणाहूनउणावताअसतां ॥ तयाचीप्रबोधूनकरावीपूर्णता ॥ अथवासमानअसलियातत्त्वतां ॥ तैसेंचिपरस्परेंबोलावें ॥ ५० ॥ त्याचेंसमाधानआपणघ्यावें ॥ आपुलेंतयासीनिरूपावें ॥ त्याचेंउणेपणउरोंनद्यावें ॥ आणिआपुलेंत्यामुळें ॥ ५१ ॥ जैसेदोनदीपअसतांसमोर ॥ फेडितीतळींचाअंधःकार ॥ तैशींगुप्तउत्थानेंपरस्पर ॥ फिटतीएकमेकांची ॥ ५२ ॥ आपणाहूनजेज्ञातेअधिक ॥ उत्थानरहितनिश्चयात्मक ॥ तयाचाहोऊनियांसेवक ॥ सहजस्थितिआकळावी ॥ ५३ ॥ ऐसेंपरस्परेंप्रबोधासी ॥ संवादसुखहोतांदिननिशीं ॥ वृद्धीचहोयअखंडैकरसीं ॥ त्रिकाळींउत्थानरहित ॥ ५४ ॥ एवंएकटअसतांघडावेंचिंतन ॥ दुजेंमिळतांकरावेंकथन ॥ ज्ञातेसाधकतरीसंवादन ॥ परस्परेंप्रबोधाचें ॥ ५५ ॥ ॥ पद ॥ एतदेकपरत्वंचब्रह्माभ्यासंबुधाःविदुः ॥ ऐशियापरीचिंतनकथनात्मक ॥ सदांहोणेंजरीनिश्चयात्मक ॥ हाचिब्रह्माभ्यासएकपरत्वेंएक ॥ पूर्णज्ञातेजाणती ॥ ५६ ॥ सदांश्रवणअथवामनन ॥ एकरूपचिंतनेंअनुसंधान ॥ यापरतेंसाधनअसेकवण ॥ मुमुक्षूसाधकासी ॥ ५७ ॥ तस्मात्हेंचिसाधनहाचिअभ्यास ॥ हाचियोगध्यानहीअसेनामयास ॥ मात्रविस्मरणनव्हावेंबुद्धीस ॥ हेंचिएकपरत्व ॥ ५८ ॥ ऐसाचिअभ्याससाधका

जरी ॥ तरीचसहजस्थितिअपैंसावरी ॥ ऐशियाअभ्यासामानवतीअंतरीं ॥ पूर्णज्ञा-
तेसहज ॥ ५९ ॥ ह्मणतीभलाभलात्यासाधका ॥ ब्रह्माभ्यासआरंभिलानिका ॥
अपरोक्षेंजाणोनियांतवका ॥ तच्चिंतनादिकरिसी ॥ ६० ॥ यापरतेंसाधनचिनल-
गे ॥ येणेंचिवस्तुतंत्रहोयनिजांगें ॥ ऐसेंचिअनुमोदनदेतीवेगें ॥ ययाअभ्यासा ॥
॥ ६१ ॥ तस्मात्पूर्णज्ञातेयाचिअभ्यासा ॥ जाणतअसतीएकपरत्वसहसा ॥ येररो-
धादिकांसाधनांफांसां ॥ अनुमोदननदेती ॥ ६२ ॥ एकपूर्णज्ञातेकिंवासाधक ॥
जेस्मरणअभ्यासाप्रवर्तक ॥ तेंचिऐशियेअभ्यासानिश्चयात्मक ॥ एकपरत्वह्मणती ॥
॥ ६३ ॥ येरउपासककर्मींकींयोगी ॥ हाअभ्यासनावडेतयालागीं ॥ परंतुजेज्ञाते
ब्रह्मात्मसंयोगी ॥ त्यांसीहाचिआवडे ॥ ६४ ॥ स्नानसंध्यायागादिनसतां ॥ होप-
ळवाटेकर्मियांसमस्तां ॥ भजनपूजनमूर्तिध्याननहोतां ॥ उपासकाअनावडी ॥
॥ ६५ ॥ मुद्रादिसाधनेंकींप्राणायाम ॥ अथवामूळबंधधारणानेम ॥ बुद्धिरोधनसतां
हायोगपरम ॥ योगियांसीनावडे ॥ ६६ ॥ तस्मात्सर्वकर्महीत्यागुनी ॥ भजनपू-
जनअव्हेरुनी ॥ आणिधीनिरोधादिउपेक्षुनी ॥ श्रवणादिकरिती ॥ ६७ ॥ श्रवण
चिंतनकथनध्यान ॥ एकरूपसर्वदांअनुसंधान ॥ हाचिब्रह्माभ्याससाधकांपूर्ण ॥
असतांआवडेज्ञानिया ॥ ६८ ॥ अगाऐशियासदाअभ्यासापुढें ॥ देहबुद्धिराहीलकोणी
कडे ॥ प्रज्वलअग्नींतजेवींनदडे ॥ कापुसपणेंकापूस ॥ ६९ ॥ देहबुद्धिजाळावयाजगीं ॥
होचिब्रह्मचिंतानिकादांडुगी ॥ याअभ्यासेंनिसंतानहोऊनवेगीं ॥ सहजस्थितिबाणे ॥ ७० ॥

त्रिविधअभिमानासगट ॥ मूलाज्ञानाचाभरीघोट ॥ सर्वअसतांचिसमाधानअविट॥ उत्थानरहितबाणे ॥ ७१ ॥ तेंचिसमाधानकैसेंनिर्धारा ॥ देहबुद्धिसदृढजैशीयेरा ॥ तैशीब्रह्मबुद्धिसदृढअंतरा ॥ हेचिज्ञानाचीपराकाष्ठा ॥ ७२ ॥ हेचिआतांएकाश्लोकीं॥ दृढापरोक्षताबोलिजेनिकी ॥ जेथेंसिद्धसाधकतासकौतुकीं ॥ भेदनिपटूनिजाय॥७३॥ आणिध्वनितार्थेंमुमुक्षुत्वाची ॥ अथवाअवधीसाधकत्वाची ॥ प्रसंगेंकळेलस्थितिपूर्णतेची ॥ बाणतांदृढ ॥ ७४ ॥ इतुकेंएकाश्लोकाचेंनिरूपण ॥ सांगसाकल्यत्वेंकरून ॥ वक्तृत्वआटोपूंअवधारासंपूर्ण ॥ एकाग्रभावेंसाधक ॥ ७५ ॥

॥ श्लोक ॥ देहात्मधीवद्ब्रह्मात्मधीदार्ढ्येकृतकृत्यता ॥ यदातदायंम्रियतांमुक्तोनास्त्यत्रसंशयः ॥ १८ ॥ इतिश्रीमच्छंकराचार्यविरचितालघुवाक्यवृत्तिःसमाप्ता ॥ टीका ॥ देहआपणजैसेंसर्वत्रांसी ॥ सदृढचिबैसलेंसेबुद्धीसी ॥ ब्रह्मात्मत्वसदृढबुद्धिजरीऐशी ॥ तरीकृतकृत्यताजाहली ॥ ७६ ॥ ऐशीदृढबुद्धियोगेंकृतकृत्यता ॥ उत्थानरहितजाहलीअसतां ॥ मगतोजेधवांमरेकर्मसरतां ॥ तेधवांमरोसुखें ॥ ७७ ॥ परंतुतोजन्ममरणसंसृतीपासून॥ मुक्तजाहलानिःसंशयेंकरून ॥ यदर्थींसंशयरूपअनुमान ॥ सहसाकवणेंनकरावें ॥ ७८ ॥ अगारविदत्ता सावधअससी ॥ निरूपणआकळिलेंकींमानसीं ॥ स्मृतिरूपसाधनाचेअभ्यासीं ॥ ब्रह्मात्मत्वदृढहोय ॥ ७९ ॥ पद ॥ देहात्मधीवद्ब्रह्मात्मधीदार्ढ्येकृतकृत्यता ॥ पाहेंतुजलाजैशीदेहबुद्धि ॥ सदृढचिबैसलीअनवधि ॥ ऐशीचअभ्यासेंब्रह्मात्मासिद्धि ॥ बु-

द्धिनिश्चयायेतसे ॥८०॥ प्रथमअभ्यासेंकींविचारें ॥ लयसाक्षिज्ञानजाहलेंसाचारें ॥ त्यावरीवृत्तीचाखलहोतांनिर्धारें ॥ निश्चयदृढहोयबुद्धीचा ॥ ८१ ॥ वृत्तीचाखलयेथ-वरीकेला ॥ कींनिमिषार्धअवसरनाहींदिधला ॥ एकतानब्रह्मात्मत्ववृत्तीला ॥ वि-स्मृतीविणदृढकेलें ॥ ८२ ॥ ब्रह्मात्मत्वाचेंचिचिंतन ॥ ब्रह्मात्मत्वाचेंचिकथन ॥ प-रस्परेंअन्योन्यसंवादन ॥ जेंबोलिलेंपूर्वश्लोकीं ॥ ८३ ॥ तेंचिएकपरत्वरूपअनु-संधान ॥ भलतेअवस्थेसीराखिलेंस्मरण ॥ तेणेंचिअभ्यासेंदेहात्मभान ॥ तुटोनि जाय ॥ ८४ ॥ पहिलाबुद्धीसीनिश्चयजाहला ॥ अज्ञानेंनेणूनब्रह्मात्मयाला ॥ मीहा देहचिअभिमानधरिला ॥ असेसदृढ ॥ ८५ ॥ अनंतकल्पांमाजींअनंत ॥ सानथो-रदेहजाहलेबहुत ॥ तितुकियाहीदेहांसीमीमीकरित ॥ अभिमानवाहतचिआला ॥ ॥ ८६ ॥ एकादेहींहीअवस्थातीन ॥ जागृतिसुषुप्तिआणिस्वप्न ॥ यातिहींमाजींही देहाचेंमीपण ॥ बळकटधरिलेंसे ॥८७॥ यातिहींअवस्थेंततीनअभिमान ॥ हेंजाह-लेंअसेमागांनिरूपण ॥ परीमागुतींतेंचिआतांअल्पकथन ॥ कीजेकळावया॥ ८८ ॥ जागृतींतजोंवरीव्यापारत ॥ प्रत्यक्षदेहासीप्रत्यक्षभोगघडत ॥ तेव्हांयासर्वसंघा-सीमीह्मणूनधरित ॥ सदृढसाभिमानें ॥ ८९ ॥ ऐसादेहआपणसदृढजाहला ॥ न-विसरेचिऐशियाअभिमानाला ॥ आणिसंपादितसर्वविषयांला ॥ माझेंमाझेंह्मणे ॥ ॥ ९० ॥ एवंदेहाचेंमीपणहेंहेंमाझें ॥ बळकटघेऊनबैसलावोझें ॥ ऐसाहाउभयरू-पीसाभिमानबुझें ॥ विश्वनामपावला ॥ ९१ ॥ तेंचिप्रत्यक्षविषयनसतां ॥ इंद्रि-

यद्वाराबहिर्मुखनहोतां ॥ स्वप्नअवस्थाहोतसेआंतौता ॥ ध्यासेंजागृतीच्या ॥९२॥
मागेंकेलेंतितुकेंस्मरे ॥ पुढेंअमुककरीनसाचोकारें ॥ ऐसाकर्तेपणंउगाहुंबरे ॥ एकरू-
पसदां ॥९३॥ पुण्यपापजेंजेंकेलें ॥ तेंतेंभोगीनअवश्यपाहिलें ॥ येथूनहीकरीनसाम-
र्थ्येंआपुले ॥ पुढेंसुखभोगावया ॥ ९४ ॥ ऐसाकर्तेपणाकींभोक्तेपणाचा ॥ अंतरीं
ध्याससदृढसाचा ॥ हाचितैजसअभिमानजन्ममृत्यूचा ॥ दायकहोय ॥ ९५ ॥ मु-
ख्यनेणपणाचाअभिमान ॥ लयहीपावतांजागरस्वप्न ॥ सुषुप्तिकाळींउरेतोचिप्राज्ञ॥
बीजउत्पत्तीचें ॥ ९६ ॥ एवंजागरींमीमाझेपणेंविश्व ॥ स्वप्नींकर्ताभोक्तातैजसनांव॥
सुषुप्तींतमीनेणताप्राज्ञस्वयमेव ॥ ऐसेअभिमानतीन ॥ ९७ ॥ हेसाभिमानकदांही
त्यागीना ॥ देहाचासदृढधरिलामीपणा ॥ तेणेंचिनसतांपावेजन्ममरणा ॥ कोटि
कोटिकल्पें ॥९८॥ हेअसोअज्ञानाचीवार्ता ॥ परीअभ्यासेंकींविचारेंतत्त्वतां ॥ जरी
लयसाक्षिज्ञानजाहलेंआतां ॥ तरीपूर्वाध्यासनसोडी ॥ ९९ ॥ देहप्राणइंद्रियेंमनबु-
द्धि ॥ मूळस्फूर्तिविद्याअविद्यासंबंधीं ॥ जीवेशहीप्रतिबिंबेंत्यामधीं ॥ इतुकेंहीविवेचिले
॥ ५३०० ॥ हाइतुकाहीसर्वसमुदाय ॥ मिथ्यात्वेंविवेचिलाकींमीनहोय ॥ मीब्रह्मा-
त्माएकरूपअद्वय ॥ त्रिधाप्रतीतीनेंकळला ॥ १ ॥ तरीहीएकाएकींपूर्वाध्यास ॥ न-
सोडीययादेहादिकास ॥ भलतेप्रसंगेंअहंदेहबुद्धीस ॥ घेतप्रगटकींगुप्तत्वें ॥ २ ॥
ऐसाहीदुस्तरसाभिमान ॥ निःशेषनिमेजरीघडेसाधन ॥ जेंनिरोपिलेंस्मरणरूपअ-
नुसंधान ॥ तच्चिंतनादिसदां ॥ ३ ॥ अहंब्रह्मास्मिहेंचिंतन ॥ जेंजाणिलेंलयसाक्षि-

ज्ञान ॥ तेंचिनिश्चयेंसीब्रह्मआपण ॥ नविसरतांस्मरावें ॥ ४ ॥ आणिदेहादिआप-
णकदांनव्हे ॥ याचेंहीविस्मरणनपडावें ॥ एकतानअनुसंधानअसावें ॥ ब्रह्मसत्य
जगमिथ्या ॥ ५ ॥ बत्तीसप्रकारेंहेंजग ॥ सर्वमिथ्याचिरज्जुभुजंग ॥ ब्रह्मात्माचिस-
त्यसत्यअभंग ॥ आपणहीतेंचि ॥ ६ ॥ इतुक्यानिश्चयाचेंसदास्मरण ॥ एकतान
राखावेंअनुसंधान ॥ निद्रालागेतोंजागेंजाहलियापासून ॥ यावत्प्राणहीराखावें ॥७॥
केव्हांमननरूपचिंतन ॥ केव्हांवाणीनेंघडावेंकथन ॥ मुख्यकारणकींनपडावेंविस्मर-
ण ॥ लयसाक्षित्वाचें ॥ ८ ॥ नुसधीध्येयाकारवृत्तिअसावी ॥ तदाकारेंचिउठोनि
निमावी ॥ परीतथापिउद्भवतांस्मृतिअसावी ॥ ब्रह्मात्मयाचीबुद्धीसी ॥ ९ ॥ ऐसा
ध्याससदृढलागतां ॥ कोठेंउरेलदेहबुद्धीचीवार्ता ॥ निपटूनपूर्वाध्यासाचेहोयघाता ॥
ब्रह्मात्मत्वचिदृढहोय ॥ १० ॥ जैशीजैशीब्रह्मात्मबुद्धिवाढे ॥ तैशीतैशीदेहबुद्धिमोडे
॥ निःशेषनिमतांसहजस्थितिजोडे ॥ जेपूर्णज्ञातयासदां ॥ ११ ॥ परीअभ्यासमा-
त्रस्मरणाचा ॥ केलाचिकरावासाधकेंसाचा ॥ पूर्वाध्यासहोतांचिदेहादिकाचा ॥ मो-
डूनब्रह्मात्मत्वस्मरावें ॥ १२ ॥ देहादिकआपणनव्हेचिनव्हे ॥ मगकासयात्या-
चेंवर्तनघ्यावें ॥ भलतेअवस्थेंतअसेनास्वभावें ॥ आपुलेंकायगेलें ॥१३॥ ऐसानिश्च-
यकेलाचिकरावा ॥ ब्रह्मात्मास्वयेंस्मरलाचिस्मरावा ॥ हासमुदायत्यागिलाचित्या-
गावा ॥ बलात्कारेंस्फुरतांची ॥१४॥ ऐशियास्मरणरूपअभ्यासें ॥ त्रिविधामीपणग-
ळेआपैसें ॥ देहात्मत्वबुद्धीसीहोतेंजैसें ॥ तैसेंब्रह्मात्मत्वहोय ॥ १५ ॥ परंतुहळुहळु

साधेलसर्व ॥ एकदांचिनमोडेपूर्वस्वभाव ॥ विश्वतैजसप्राज्ञाचाहीठाव ॥ अशेषें मोडेअनुक्रमें ॥ १६ ॥ आधींविश्वाभिमानीहामरे ॥ त्यामागूनतैजसहीवोसरे ॥ पुढें प्राज्ञअभिमानएकसरें ॥ मावळूनउरेब्रह्मात्मा ॥ १७ ॥ परीस्मरणरूपजोअभ्यास ॥ सोडूंचनयेब्रह्मात्मध्यास ॥ तच्चिंतनादिएकपरत्वास ॥ केलेंचिकरावें ॥ १८ ॥ हें साधकासीभाष्यआमुचें ॥ देतअसोंहेंमानोंनिकरासाचें ॥ निसंतानहोऊनतिन्हीअ-भिमानाचें ॥ ब्रह्मात्मत्वदृढहोय ॥ १९ ॥ हेंसत्यसत्यसत्यत्वेंप्रमाण ॥ अन्यथा नव्हेआमुचेंवचन ॥ परीकेलेंपाहिजेएकतान ॥ अनुसंधानसर्वदां ॥ २० ॥ अ-भ्यासावीणनघडेकदां ॥ नतुटेदेहबुद्धीचीआपदा ॥ नजोडेवस्तुतंत्रत्वेंसंपदा ॥ हेंहीसत्यसत्य ॥ २१ ॥ तस्मात्खरेंजयासीतरणें ॥ तेणेंसदांअसावेंअनुसंधा नें ॥ तरीब्रह्मत्वदृढहोऊनजाणें ॥ गळूनदेहबुद्धि ॥ २२ ॥ आतांअसावेंसाव धान ॥ अनुक्रमेंगळतीतिन्हीअभिमान ॥ तयांचेअवधींचीवोळखण ॥ बोलिजे अवधारा ॥ २३ ॥ आरंभींमीमाझेपणजेंअसे ॥ जयासीविश्वाभिधानठेविलेंसे ॥ तेंचिक्षीणहोययाअभ्यासें ॥ ध्यासेंब्रह्मात्मयाच्या ॥ २४ ॥ अपरोक्षेंज्ञानब्रह्मात्म-याचें ॥ जाहलेंविचारेंलयसाक्षित्वाचें ॥ तत्क्षणींचानिर्मूळमीमाझेपणाचें ॥ नव्हेसह-सा ॥ २५ ॥ पूर्वीलध्यासेंदेहासीमीपण ॥ घेऊनउठेलवृत्तिउद्भवून ॥ जरीकळलें अहंब्रह्मह्मणून ॥ तरीघेतांनराहे ॥ २६ ॥ हाचिविक्षेपआवरणहीगेलिया ॥ उद्भ-वेलगुप्तकींप्रगटतया ॥ देहमीह्मणूनउठतांआपसया ॥ माझेपणधरील ॥ २७ ॥

अमुककुळींअमुकआश्रमाचा ॥ अमुकेस्थळींअमुकवर्णाचा ॥ ऐसाउद्गारहोयजरीबु-द्धीचा ॥ हाप्रगटविक्षेप ॥ २८ ॥ ऐसाहीउद्गारनहोतां ॥ सहजगतींचांगुलपणात-त्त्वतां ॥ देहादिकांचावाटेजरीआंतौता ॥ हागुप्तत्वेंविक्षेप ॥ २९ ॥ गुप्तअथवाप्रग-टमीपण ॥ होतांब्रह्मात्मबुद्धीचेंहोयहनन ॥ आणिमीपणेंधरीतसेमाझेंह्मणून ॥ जें संपादितपूर्वापर ॥ ३० ॥ माझेपणींहीदोनचिप्रकार ॥ एकप्रगटउठेमाझेंह्मणूनउ-द्गार ॥ एकसहजगतीकळवळेअंतर ॥ हेंचिगुप्तत्वेंउठे ॥ ३१ ॥ असोऐसेंमीपणकीं माझेपण ॥ गुप्तअथवाप्रगटउद्भवण ॥ हेंगळतीयाअनुसंधानेंकरून ॥ चिरकाळअ-भ्यासें ॥ ३२ ॥ ब्रह्मात्म्याहूनजेंजेंवेगळें ॥ तेंतेंमिथ्यात्वेंविवेचिलेंसकळें ॥ यावरी स्मरतसेमिथ्यात्वेंनिर्फळें ॥ तरीयेणेंगळेमाझेपण ॥ ३३ ॥ माझेंह्मणूनविक्षेपेंस्फुर-तां ॥ मिथ्याऐसेंस्मरतसेतत्त्वतां ॥ तत्क्षणींमावळेपरीमागुता ॥ माझेपणाउफाळे ॥ ३४ ॥ पुन्हांउठतांचिमिथ्यात्वेंस्मरावें ॥ तयासीपुरतेंउठोंचिनद्यावें ॥ ऐसेंचि सर्वदांअभ्यासावें ॥ निःशेषनिमेतोंवरी ॥ ३५ ॥ निःशेषनिमाल्याचीवोखळण ॥ कळावयाबोलिजेसावधान ॥ अलभ्यपदार्थजातीनासून ॥ परीअंतरकळवळेना ॥ ॥ ३६ ॥ अतिदुःखरूपहोतेंतेंगेलें ॥ अतिसुखकरइंद्रपदप्राप्तजाहलें ॥ तरीहर्षेना गुप्तत्वेंहीपाहिलें ॥ जैसेंअंतःकरण ॥३७॥ अथवाअतिसुखकरपदजातां ॥ अतिदुः-खकरपदार्थमीनतां ॥ खेदउद्भवेनाअंतराआंतौता ॥ गुप्तत्वेंही ॥ ३८ ॥ जैसापांथस्थ राहिलापराचेघरीं ॥ त्याचेंद्रव्यहरोननेलेंतस्करीं ॥ अथवामृत्युपावलीपद्मिनीनारी॥

आपणदृष्टीनेंपाहतसे ॥ ३९ ॥ परीकिमपिखेदनवाटेजैंसा ॥ स्वस्थनिवांतअसेमानसा ॥ तैसेंनिजधनकींस्वकुटुंबहानिसहसा ॥ होतांनकळवळावें ॥ ४० ॥ अथवापरस्थळींएखादिया ॥ अलभ्यलाभजाहलाभलतिया ॥ तोपाहतअसतांहीजैसायया ॥ हर्षवाटेना ॥ ४१ ॥ तैसाचिहर्षजरीइंद्रसंपत्ति ॥ मीनतांहीउद्भऊनयेचित्तीं ॥ एवंपरकीयापरीपहावेंआपणाप्रती ॥ तरीहर्षखेदकैंचे ॥ ४२ ॥ बहुकासयासीविस्तार ॥ कळवळाचिनुठावाअणुमात्र ॥ जोकांपिळतसेसहजअंतर ॥ देंठनाभीचा ॥ ४३ ॥ मगअसोमहालाभकींहानि ॥ परीकळवळीचनाअंतःकरणीं ॥ जैशीपराचीदेखतांहीनयनीं ॥ तैशीचसहजस्वदेहाची ॥ ४४ ॥ ऐशीदृढताजरीआपुली ॥ खरेंपणेंअसेलजाहली ॥ तरीजाणावीनिःशेषतुटली ॥ भुलीमाझेपणाची ॥ ४५ ॥ ऐशीप्रतीतिजयाचीतेणें ॥ वोळखावीआपुलेंअंतःकरणें ॥ जरीकळवळीचनादृढसमाधानें ॥ असतांमाझेपणगळालें ॥ ४६ ॥ नातरीमाझेंकांहीनाहींवरीवरी ॥ बोलतसेपरीकळवळेअंतरीं ॥ तोचिजाणावाआत्महत्यारी ॥ जोनतारीआपणा ॥ ४७ ॥ तरीऐसेंसाधकेंनकरावें ॥ अंतरींचेंयथार्थवोळखावें ॥ कींहानिलाभेंनकळवळावें ॥ सहसागुप्तही ॥ ४८ ॥ तथापिकळवळाजरीउठे ॥ तरीअभ्यासकरावाचिनेटें ॥ जेव्हांनिपटूनहर्षविषादतुटे ॥ तेव्हांचिनिवांतव्हावें ॥ ४९ ॥ ऐसामाझेपणानिपटूनगेलियाचा ॥ अवधिसांगितलाअसेसाचा ॥ परीमीपणाजाईलजेव्हांदेहाचा ॥ तेव्हांचिमाझेपणागळे ॥५०॥ मीपणगुप्तत्वेंजरीदेहाचें ॥ तरीमाझेपणनिमालेंनवचे ॥

परंतुआधींसांगितलेंअवधीचें ॥ लक्षणकळावया ॥५१॥ तस्मात्आधींमीपणतुटावें॥ तरीमाझेपणअपैसयागळावें ॥ तेंमीपणजावयाअभ्यासावें ॥ अहंब्रह्मास्मिस्वयें ॥ ॥ ५२ ॥ वृत्तीनेंलयसाक्षित्वलक्षावें ॥ बुद्धीनेंतेंचिनिश्चयाआणावें ॥ मनेंहीतेंचि आपणाचिंतावें ॥ उच्चारावेंवाणीनें ॥ ५३ ॥ स्फूर्तीपासूनदेहापर्यंत ॥ हामीनव्हे- चिसर्वसंघात ॥ अहमात्मामीस्वयेंअनंत ॥ एकतानस्मरावा ॥ ५४ ॥ पूर्वाध्यासें जरीदेहाचें ॥ मीपणगुप्तकींप्रगटउठूंलागेसाचें ॥ तरीतेंविवेचूनत्यागावेंअंतरींचें ॥ अहंब्रह्मास्मिस्मरोनी ॥ ५५ ॥ अहंब्रह्मास्मीचाविसर ॥ पडोंचिनयेनिमिषमात्र ॥ मगकैंचाहोईलययाअवरस ॥ देहाचेमीपणासी ॥ ५६ ॥ अहंब्रह्मात्मानिश्चयवा- ढे ॥ अहंदेहात्मानिःशेषमोडे ॥ परीसाधकेंअभ्यासावेंकोडें ॥ बोलिल्यारीतीं ॥ ॥ ५७ ॥ आतांमीपणगेलियाचीखूण ॥ बोलिजेअंतरींपहावीवोळखून ॥ भलतेअ- वस्थेसीदेहाचेंवर्तन ॥ परीमीह्मणूनस्फुरेना ॥ ५८ ॥ जागरींव्यापारहोतअसतां॥ परीमीअमुकवर्णाश्रमीतत्त्वतां ॥ अथवासुखदुःखीकींनांवेंबाहतां ॥ मीह्मणूनस्फु- रेना ॥ ५९ ॥ ऐसाजागृतींतदृढजाहलिया ॥ स्वप्नींहीमीपणस्फुरेनातया ॥ अहंब्र- ह्मास्मीचयेतसेप्रत्यया ॥ भासदेहाचेठाईं ॥ ६० ॥ बहुकासयागाढझोंपेआंत ॥ लयसाक्षित्वउरेनेणीवराहित ॥ ॥ तेसमईंकोणीहीरविदत्त ॥ ह्मणोनिबाहे ॥ ६१ ॥ तेव्हांउठोनिबोलेतयासी ॥ परीमीनव्हेहानामरूपीआकारेंसी ॥ अहंब्रह्मप्रतीति कींअविनाशी ॥ स्मरोनिव्यापारहीसंपादी ॥ ६२ ॥ ऐसेंभलतेअवस्थेभलतेव्यापा-

रीं ॥ देहादिवर्ततांत्यात्याअनुकारीं ॥ परीगुप्तहीस्फुरेनाअंतरीं ॥ मीदेहह्मणोनी ॥ ६३ ॥ स्वप्नींकींसुषुप्तीचेअंतीं ॥ जरीनस्फुरेदेहादिअहंस्फूर्ति ॥ माजागरींतोंप्रबोधाचीउन्नति ॥ तेव्हांतोअवसरकैंचा ॥ ६४ ॥ यारीतींजेधवांदेहबुद्धीचा ॥ मीपणामावळेलनिपटूनसाचा ॥ ऐसाअंतरींप्रत्ययजयाचा ॥ तेणेंचिपहावा ॥ ६५ ॥ निःशेषमीपणउठूंराहिलें ॥ आणिदेहतरीवर्तेरीतींपहिले ॥ तरीमगजाणावेंमीपणगेलें ॥ माझेपणासहित ॥ ६६ ॥ मीपणाचिजरीनस्फुरेदेहाचा ॥ तरीमगमाझेपणाउद्भवेकैंचा ॥ एवंमीमाझेंयाउभयात्मकाचा ॥ विश्वाभिमानएक ॥ ६७ ॥ ऐसाविश्वाभिमानीनिमाल्याचा ॥ अंतरींप्रत्ययपहावासाचा ॥ मगवरुतीबोलेनावाचा ॥ मीमाझेंहीह्मणोनी ॥ ६८ ॥ अंतरींचेंमात्रनिपटूनिजावें ॥ देहात्मबुद्धीचामोडहीनुद्भवे ॥ तरीमगपराकाष्ठेसीसाधकेंजाणावें ॥ कींनिमालाविश्वाभिमान ॥ ६९ ॥ ऐसेंनघडतांउगावरीवरी ॥ मीमाझेंह्मणूनकदांनुच्चारी ॥ परीम्यांसुखीअसावेंवाटेअंतरीं ॥ तोनिरभिमानीनह्मणावा ॥ ७० ॥ तस्मात्साधकेंखरेंचितरावें ॥ मीमाझेपणखांडूनकाढावें ॥ नातरीपूर्वरीतींचअभ्यासवें ॥ निशेःषनिमेलतोंवरी ॥ ७१ ॥ निःशेषमीपणउठतांराहिलें ॥ ऐसेंखरेपणेंप्रत्ययाआलें ॥ तरीमगजाणावेंनिःसंतानजाहलें ॥ विश्वाभिमानाचें ॥ ७२ ॥ ऐसाविश्वाभिमानजेव्हांनिमाला ॥ तरीजाणास्थूलवोलांडिला ॥ अन्नमयदेहापासूनसुटला ॥ अहंब्रह्मअभ्यासें ॥ ७३ ॥ जरीविश्वाभिमानहीनिमतां ॥ तैजसअभिमानीउरेआंतौता ॥ ध्यासेंस्फुरतसेमी

कर्ताभोक्ता ॥ गुप्तार्किंवाप्रगट ॥ ७४ ॥ यादेहादिकांचेसंघेंकडून ॥ सर्वहोतांनराहे वर्तन ॥ आणिचतुष्टयाचेंउगेंचिंतन ॥ कदापिनराहे ॥ ७५ ॥ हेंतोंसहजगतींचहो तअसे ॥ परीसाधकसंकोचूनमानसें ॥ ह्मणेहेंहोतांनराहेतरीआपैसें ॥ केलेंतेंभोगा येईल ॥ ७६ ॥ केलेंतेंकदापिचुकेना ॥ ऐसेंबोलतीशास्त्रेंनाना ॥ तरीभोगायेतील अवश्यआपणा ॥ तस्मात्क्रियारहावी ॥ ७७ ॥ पुण्यात्मकघडतांउत्तमगति ॥ पा- पात्मकहोतांअधमगती ॥ ऐसेंस्फुरूंलागेजरीस्फूर्ति ॥ हाचिप्रगटतैजस ॥ ७८ ॥ जरीब्रह्मज्ञानहीजाहलें ॥ सर्वांवेगळेंलयसाक्षित्वकळलें ॥ तरीहीपूर्वाध्यासेंशुभाशुभ घडलें ॥ घेईलमाथां ॥ ७९ ॥ कांहींपुण्यात्मकघडतां ॥ पापात्मकासीअव्हेरितां ॥ आल्हादेंहर्षहोयचित्ता ॥ हाहीप्रगटतैजस ॥ ८० ॥ पुण्यात्मककांहींनघडलें ॥ क- र्मबळेंपापचिघडूनआलें ॥ तेव्हांअतिखेदासीचित्तपावलें ॥ हाहीप्रगटतैजस ॥ ८१ ॥ क्षणएकवाटेमीअसंग ॥ अकर्तानिर्विकारअभंग ॥ क्षणाएकाचित्तासीलागेडाग ॥ अहंकर्तृत्वाचा ॥ ८२ ॥ असोऐसाप्रगटअभिमानी ॥ जन्मासीहोईलचिदानी ॥ परीगुप्तत्वेंउठेजोअंतःकरणीं ॥ तोहीसंसृतींतपाडी ॥ ८३ ॥ तयागुप्तरूपेंतैजसाचें ॥ रूपबोलिजेसंकेतेंवाचे ॥ मनबुद्धीसीतोविशेषेंनवचे ॥ परीसामान्यवृत्तीसीस्फुरे ॥ ॥ ८४ ॥ सहजगतींपुण्यात्मकासी ॥ अथवापापात्मकानघडतांवृत्तीसी ॥ विशेषेंन घेतांहीसहजत्वेंसी ॥ हर्षाकारताउठे ॥ ८५ ॥ कर्मबळेंपापात्मकघडलें ॥ पुण्यात्म- कनाहींघडूनआलें ॥ विशेषेंबुद्धीसीनाहींस्पर्शलें ॥ परीसहजखेदावेवृत्ति ॥ ८६ ॥

एवंविशेषेंनिश्चयातरीनयेतां ॥ हर्षखेदात्मकस्फुरतां ॥ हाचिगुप्तसाभिमानतत्त्वतां ॥ तैजससूक्ष्मदेहाचा ॥ ८७ ॥ ह्मणसीप्रगटविशेषेंनव्हेजरी ॥ तरीबाधकअसेलकत्र- णेपरीं ॥ परंतुविचारूनपाहेंअंतरीं ॥ हेंचिबीजउत्पत्तीसी ॥ ८८ ॥ हेंबीजजरीगुप्त- त्वेंउरतां ॥ विशेषासीउद्भवहोयतत्त्वतां ॥ तस्मात्गुप्तत्वेंहीहर्षखेदाकारता ॥ वृत्ती- सीनुरावी ॥ ८९ ॥ यासीअभ्यासहाचिकरणें ॥ अहंब्रह्मास्मिएकतानस्मरणें ॥ येरहेंमिथ्यात्वेंस्मरावेंवृत्तीनें ॥ किमपिविस्मरनहोतां ॥ ९० ॥ अगाऐशियाअभ्या- सापुढें ॥ तैजसअभिमानाचेंहोयमढें ॥ कदांहीगुप्तत्वेंनुठेसांकडें ॥ सहजचिहर्षखे- दाचें ॥ ९१ ॥ तस्मात्अभ्यासवास्तविककरावा ॥ निपटूनतैजसअभिमानदवडा- वा ॥ तरीचहाभवपाशतुटावा ॥ लयसाक्षीहीकळल्यावरी ॥ ९२ ॥ जरीलयसाक्षि- ज्ञानहोउनी ॥ गुप्तत्वेंउरेतैजसाभिमानी ॥ तरीकैवल्यपावेलबोलेजोवाणी ॥ तया- चागुरुहीलटिका ॥ ९३ ॥ यास्तवखरेंजयासीतरणें ॥ तरीतेणेंयथार्थअभ्यासक- रणें ॥ अभ्यासेंनिपटूननाशहोणें ॥ हेंसत्यसत्यात्रिवाचा ॥ ९४ ॥ निःशेषतैजसा- भिमाननिमाला ॥ याचीअवधिसांगूंसाधकाला ॥ तैशीवोळखनपहावीअंतराला ॥ गुप्तत्वेंहीउठेकींनुठे ॥ ९५ ॥ भलतैसादेहहावर्तो ॥ पुण्यकींपापात्मकाप्रवर्तो ॥ मनबुद्धीहीपाहिजेतेंचिंतो ॥ वाणीबडबडोभलतैशी ॥ ९६ ॥ बहुकासयाज- गसर्वसंहारो ॥ आपुलेहातेंनिपटूनमारो ॥ अथवासर्वांवांचवोकींनिर्माणकरो ॥ परीहर्षखेदनुठे ॥ ९७ ॥ कायहोहेंमीपापकरिताजाहलों ॥ कायहोपुण्यनार्हीं

आचरलों ॥ अथवापापासीनाहींस्पर्शलों ॥ पुण्यचिकेलेंउदंड ॥ ९८ ॥ ऐ-
साखरखराहर्षशोकाचा ॥ गुप्तहीनुठेअंतरींसाचा ॥ उगाचिसहजगतींवर्तणुकी-
चा ॥ परोक्षरीतींतमाशापाहे ॥ ९९ ॥ स्फूर्तीपासूनदेहापर्यंत ॥ जैसापरकीयको-
णीअसेवर्तत ॥ आणिहेंस्वपरजगसमस्त ॥ कळसूत्रापरीपाहे ॥ ५४०० ॥ अथ-
वाभिंतीवरीलचित्रेंसर्व ॥ त्यांतचिआपुलेदेहाचागौरव ॥ काढिलेकींमोडिलेअपूर्व॥
तरीपापपुण्याठावकैंचा ॥१॥ आपुलेदेहासीमीह्मणेना ॥ हेंजगसर्वमिथ्यात्वेंगंधर्व-
रचना ॥ तरीकोणमारीकोणपावेमरणा ॥ कोणजीवेकोणजीववी ॥ २ ॥ ऐसाकर्ते-
पणाचकिमपिनुद्भवे ॥ केलेंऐसेंहीकदांनसंभवे ॥ सर्वव्यापारतरीहोतीस्वभावें ॥ शु-
भाकिंवाअशुभ ॥ ३ ॥ कर्तेपणकींकेलेंऐसें ॥ नुद्भवेचिवर्ततांहीभलतैसें ॥ मगहर्षखे-
दउद्भवतीलकैसे ॥ गुप्तकींप्रगट ॥ ४ ॥ ऐसाखरखराकर्तेपणाचा ॥ वर्ततांहीनिपटू-
नजावासाचा ॥ गुप्तहीथाराहर्षखेदाचा ॥ मोडोनिजावा ॥ ५ ॥ कर्तेपणाजरीनिपटू-
नगेला ॥ तरीभोक्तेपणाअर्थांत्निमाला ॥ पुढीलहीसर्वधोकाहरला ॥ आणिप्रस्तु-
तभोगमाईक ॥ ६ ॥ एवंकर्तृत्वभोक्तृत्वउभयरूपी ॥ तैजसअभिमानविक्षेपी ॥ या-
चेंनिसंतानजाहलेंकिमपि ॥ लेशउरलानाहीं ॥७॥ ऐसानिःशेषनिमालाखरा ॥ तो
जयाचातेणेंपहावाअंतरां ॥ कींभलतैसेहोत्सातांव्यापारा ॥ अहंस्फूर्तिस्फुरूंनये ॥८॥
व्यापारहोतअसतांचिनव्हावी ॥ व्यापारनहोतांरोधस्थितिनसावी॥कारणकींजोंवरी
निर्व्यापारताबरवी ॥ तोंवरीदेहात्मत्वनस्फुरे ॥ ९ ॥ निर्व्यापारसमाधिविसर्जून ॥

होईलजेधवांबुद्धीचेंउत्थान ॥ तेधवांउठेलमीदेहम्हणून ॥ तस्मात्नसावानिरोध ॥ १० ॥ जेपाहिजेतेंव्यापारव्हावे ॥ बुद्ध्यादिदेहांतआघवे ॥ तिहींहीअवस्थांमाजीं नस्फुरावें ॥ देहात्मत्वगुप्तही ॥ ११ ॥ किंचितहीनस्फुरेसेंजाहलें ॥ तेंजयाचेंतयासी प्रत्ययाआलें ॥ म्हणिजेजाणावेंक्षयातेंपावलें ॥ उत्थानतैजसाचें ॥ १२ ॥ नातरी अभ्यासाविरहित ॥ उगाचिएखादाअकर्तेपणादावित ॥ अंतरींअहंस्फूर्तिअसेउठत॥ तोमुक्तकदांनम्हणावा ॥ १३ ॥ तस्मात्तैजसनिमालाअसेखरा ॥ ऐसाप्रत्ययबा- णावाअंतरां ॥ बोलिल्यारीतींभलतैसेव्यापारा ॥ नुद्भवावागुप्तही ॥ १४ ॥ तोंवरी अभ्यासकदांसोडूंनये ॥ निःसंशयेंसीपावेलक्षय ॥ वास्तविकानिमाल्याचाआलाप्र- त्यय ॥ तरीसाध्यरूपजाहला ॥ १५ ॥ एवंऐसातैजसजरीनिमाला ॥ सर्वव्यापारीं विक्षेपनाहींस्फुरला ॥ तरीजाणावासूक्ष्मदेहवोलांडिला ॥ स्वप्नासहितसाधकें ॥१६॥ जरीतैजसनिःशेषसरे॥तरीहीप्राज्ञअभिमानउरे॥कैसाम्हणसीतरीअतिआदरें॥श्रवण करावें॥१७॥अकर्तेपणवास्तविकजाहलें॥तैजसाचेंस्फुरणमावळलें॥सहजस्थितीनेंवर्तूं लागलें ॥ हेसहजसमाधि ॥१८॥ सदाएकतानब्रह्माकार ॥ दुजास्फुरेनाकिंचितउद्गा र॥हेंजगकींहामीनव्हेचिअनुकार ॥ ओतप्रोतब्रह्मात्मा ॥१९॥ ऐशियासहजसमाधि- माजीं ॥ किंचित्स्फूर्तिनसतांहीदुजी ॥ परीतेथेंमूलाज्ञानअसेसहजीं ॥ ध्येयध्यान त्रिपुटिरूपें ॥ २० ॥ तेंमूलाज्ञानकोणतेंह्मणसी ॥ तरीअवधारावेंनिश्चितमानसीं ॥ मीअकर्तेपणेंअखंडैकरसीं ॥ समाधानपावलों ॥ २१ ॥ ऐसासमाधानरूपअनुभवा-

चा ॥स्फुरतअसेमीपणासाचा ॥ तोब्रह्मात्मान्व्हेप्रत्यक्षदेहादिकांचा ॥ अध्यास घेतला ॥२२॥ आपणअनुभाव्यरूपस्वतांअसोनी ॥ अनुभविताजाहलावेगळेपणीं ॥ हेंचिविसरणेंब्रह्मात्मयालागुनी ॥ होंचिमूलाज्ञान ॥ २३ ॥ येऱ्हवींब्रह्मात्मायामाये-कडून ॥ केव्हांजाहलाहोतानिर्माण ॥ तरीपावलाअनुभवरूपसमाधान ॥ हेंसहसा नघडे ॥ २४ ॥ तस्मात्अन्याचाध्यासघेतला ॥ मीपावलोंब्रह्मसुखाला ॥ हेंचिवि-स्मरणरूपेंभिन्नपडिला ॥ कारणाभिमानीप्राज्ञ ॥ २५ ॥ याप्राज्ञाचेहीप्रकारदोन ॥ एकगुप्तएकप्रगटपावेउत्थान ॥ जोमीसुखीऐसेंवृत्तीचेंभान ॥ हाअभिमानप्रगट ॥ ॥ २६ ॥ मीधन्यजाहलोंमुक्तआतां ॥ विसर्जूनियांसर्वसंघाता ॥ धन्यमीचपावलों अभिन्नता ॥ हाप्रगटकींप्राज्ञ ॥ २७ ॥ ऐसाविशेषभावनसतांजरी ॥ उगीसमाधा-नाचीतृप्तिवरी ॥ सामान्यवृत्तिब्रह्मसुखानुकारी ॥ हागुप्तत्वेंप्राज्ञ ॥ २८ ॥ ऐसाउ-भयरूपीप्राज्ञअसतां ॥ तेह्मणूंनयेपूर्णअभिन्नता ॥ केवलअभिन्नजेवस्तुतंत्रता ॥ हो-णेंउरलीअसे ॥ २९ ॥ आणिहेंमूलाज्ञानचिउत्पत्तीसी ॥ कारणअसेकींबीजरूपेंसी ॥ याप्राज्ञापासूनजन्मउभयांसी ॥ तैजसविश्वाचा ॥ ३० ॥ हेंमूळबीजतैसेंचउरलें ॥ आणिविश्वतैजसजरीनिमाले ॥ तरीतेजाणावेउद्भवतीलपहिले ॥ रीतींमागुतीही ॥ ॥ ३१ ॥ तस्मात्ऐशियामूलाज्ञानासहित ॥ प्राज्ञअभिमानाचाव्हावाघात ॥ तरी-चवस्तुतंत्रत्वेंकैवल्यापावत ॥ साधकत्वत्यागेंसाध्या ॥ ३२ ॥ ऐसेंहेंमूलाज्ञानजा-वया ॥ वस्तुतंत्रअभिन्नव्हावया ॥ अभ्यासचिपाहिजेशिष्यराया ॥ चिरकाळब्रह्मा-

स्मीचा ॥ ३३ ॥ हाजोब्रह्मींचाअनुभविता ॥ पावलासहजसुखाकारता ॥ तोमीब्र-
ह्मनव्हेचिस्वतां ॥ केवळनिर्विकार ॥ ३४ ॥ यापरताजोस्वयेंनिर्विकार ॥ लयसा-
क्षीअभंगनिर्धार ॥ ध्याताज्यासुखेंसुखाकार ॥ तोमीब्रह्मात्मास्वयें ॥ ३५ ॥ त्या
माझामजकैंचाअनुभव ॥ सुखसुखीहेदोनकैंचेंनांव ॥ तस्मात्हाअवघामायीकसमु-
दाव ॥ देहाध्यासरूप ॥ ३६ ॥ समाधियोगेंब्रह्मानुभवहोणें ॥ जेणेंलयसाक्षीज्ञानें
वोळखणें ॥ तेसर्वहीआभासाचींलक्षणें ॥ निरोपिलींमागां ॥ ३७ ॥ ब्रह्मसुखेंसुखी
जाहला ॥ ज्ञाताज्ञानेंमुक्तीतेंपावला ॥ तोहाजीवऐक्यरूपेंठेला ॥ ब्रह्माभिन्नहोउनी
॥ ३८ ॥ तस्मात्हेंसर्वआभासाचेंरूप ॥ केवळब्रह्मात्मानव्हेसच्चिद्रूप ॥ निर्विशे-
षजेंपूर्णनिर्विकल्प ॥ तेंआपणस्वयें ॥ ३९ ॥ जाणिलेंअनुभविलेंअसेजेणें ॥ तेंकदां
आपणऐसेंनस्फुरणें ॥ यापरतेंअनुभाव्यज्ञेयजेंसंचलेपणें ॥ तेंस्वयेंनिश्चयव्हावा ॥
॥ ४० ॥ समाधिसुखब्रह्मानुभव ॥ ध्यानतरीअसावेंसर्वदैव ॥ ब्रह्मचिंतनिकास्मर-
णरूपआठव ॥ वृत्तीसीसदांअसावा ॥ ४१ ॥ परीज्ञाताध्याताआठविता ॥ स्मर-
ताचिंतिताअनुभविता ॥ हामीनव्हेआभासरूपतत्त्वतां ॥ यापरतामीब्रह्मात्मा ॥
॥ ४२ ॥ ब्रह्मतरीसदांअनुभवावें ॥ परीअनुभवितेंआपणनव्हावें ॥ हेंचिमुख्यत्वेंवर्म-
जाणावें ॥ समाधानाचें ॥ ४३ ॥ हेंसर्वअसेआभासकार्य ॥ हेंमीनव्हेंचिब्रह्मअद्वय ॥
मुख्यआभासचिमिथ्यातरीधर्महोय ॥ त्याचासत्यकैसा ॥ ४४ ॥ एवंअनुभविताआ-
पणनव्हे ॥ आणिस्वतांब्रह्मतेंनिजांगेंव्हावें ॥ ऐशियापरींसदांआठवावें ॥ विस्मरण

नहोतां ॥ ४५ ॥ हाचिअभ्याससदांअसतां ॥ गळूनजायद्वैताचीवार्ता ॥ निपटूनमू-
लाज्ञानाचेहोयघाता ॥ प्राज्ञाभिमानासहित ॥ ४६ ॥ हेनिपटूनगेलियाचीअवधि ॥
अंतरींसाधकेंवोळखावीआधीं ॥ कींब्रह्मअनुभवितअसतांहीकधीं ॥ अनुभविताआ-
पणनवाटावा ॥ ४७ ॥ जैसाआरसापाहतअसतां ॥ आभासचिमीऐशीकदावार्ता ॥
कवणासीहीनुद्भवेचितत्त्वतां ॥ यारीतींआठवावें ॥ ४८ ॥ भलतेसमयींहीचुकूनी ॥
अनुभवितास्फुरूंनयेमीह्मणोनी ॥ अनुभाव्यजेंकांपूर्णपणीं ॥ तेंनिःसंशयेंआपण ॥
॥४९॥ ऐशीदृढताउत्थानरहित ॥ जरीजाहलीएकरूपसदोदित॥ तरीजाणावाजाहला
असेघात ॥ प्राज्ञअभिमानाचा ॥ ५० ॥ हाहीप्रत्ययजयाचातेणें॥ जाहलातोवोळ-
खूनिपाहणें ॥ निपटूनप्राज्ञमावळतांहोणें ॥ वस्तुतंत्रनिश्चयेंसी ॥ ५१ ॥ प्राज्ञअ-
भिमानानिःशेषनिमाला ॥ तेणेंकारणदेहदीवोलांडिला ॥ पुढेंसाधकहीह्मणूंनयेतया-
ला ॥साध्यजाहलानिःसंशयें ॥५२॥ जोंवरीश्रवणादिसंपादी ॥ विवेचूनलयसाक्षि-
त्वअनादि ॥ वोळखीजाहलीतोंवरीविशदी ॥ तोपूर्वांगमुमुक्षु ॥ ५३ ॥ पुढेंअभ्यासें
मीमाझेपण ॥ गळालाहाविश्वाभिमान ॥ तेव्हांमुमुक्षुत्वसंपलेंपूर्ण॥ तोंवरीउत्तरांग-
मुमुक्षु ॥ ५४ ॥ त्यापुढेंकर्तृत्वभोक्तृत्वनिमेजोंवरी ॥ पूर्वांगसाधकह्मणावातोंवरी ॥
उत्तरांगसाधकताअसेनिर्धारी ॥ प्राज्ञनिमेतोंपर्यंत॥ ५५ ॥ प्राज्ञनिःशेषजेव्हांनि-
माला ॥ मूलाज्ञानाचाघातजाहला ॥ तेव्हांतोसाधकत्वापासूनसंचला ॥ साध्यरूप
वस्तुतंत्र ॥ ५६ ॥ त्रिपुटीक्षीणहोयतोंपर्यंत ॥ कर्तृतंत्रत्वेंसाधकह्मणवित ॥मूलाज्ञा-

नरूपीप्राज्ञाचाघात ॥ होतांसाध्यब्रह्मअंगें ॥ ५७ ॥ ब्रह्मनब्रह्मवित्स्वयेंअंगें ॥ ब्रह्मवेत्तानव्हेऐसेंश्रुतिसांगे ॥ तरीतोकेवळब्रह्मचिअभंगें ॥ सिद्धत्वेंविराजे ॥ ५८ ॥ ऐसातिहीदेहांसीवोलांडूनी ॥ तिहींअवस्थांतेंत्यागुनी ॥ तिहींअभिमानांतेंविसर्जूनी ॥ निजांगेंब्रह्मजाहला ॥ ५९॥ अभ्यासेंइतुकेंदृढजाहलें ॥ कींदेहादिभलतेअवस्थेव्यापारले ॥ परीआपुलेंब्रह्मात्मत्वतेंसंचलें ॥देहात्मभावात्यागुनी ॥ ६० ॥ समाधिकाळींकींजागृतीआंत ॥ स्वप्नींअसोकींसुषुप्तींत॥ यासंघातासीमीह्मणूननस्फुरत॥ ब्रह्मअंगेंत्याविसरुनी ॥ ६१ ॥ जैसादेहाचिआत्मादृढजाहला ॥ तैसाब्रह्मात्मनिश्चयसदृढकेला ॥ भलतेअवस्थेदेहभावनाहींगेला ॥ तैसाब्रह्मात्मभावसदृढ ॥ ॥ ६२ ॥ देहात्मबुद्धिऐसाम्हणोनी ॥ दृष्टांतजोदिधलापूर्णपणीं ॥ तोअतियुक्तअसेजाणतीज्ञानी ॥ निश्चयरूप ॥ ६३ ॥ जोदेहजयाप्राप्तजाहला ॥ तोजैसामीम्हणूनबैसला ॥ भलतेअवस्थेसीहीपालटला ॥ नजायकिंचित ॥ ६४ ॥ बालतारुण्यकींवृद्धपणीं ॥ गर्भीकिंवामरणावसानीं ॥ श्रीमान्कींकरंटाअसोजनीं ॥ परीमीपणनत्यागीकिंचित ॥ ६५ ॥ पांचाहीव्यापारींजागृतींत ॥ स्मरतांनस्मरतांअबाधित ॥ देहाचेंमीपणअसेसदोदित ॥ विसरूनहीत्यागीना ॥ ६६ ॥ हेअसोजागृतीचीकथा ॥ परीमीम्हणूनभोगीस्वप्नावस्था ॥ सुषुप्तीमाजींहीसर्वथा ॥ नेणिवाभिमाननत्यागी ॥ ६७ ॥ समुदार्यीकींअसोएकला ॥ जरीमदिरादिपानेंभ्रमला ॥ तरीहीमीम्हणेनाभलत्याला ॥ हाइतुकाचिआपणदृढ ॥ ६८ ॥ ऐशीदेहात्म-

बुद्धिसर्वजनांसी ॥ आणिअसेज्ञानापूर्वींआपणाजैशी ॥ ज्ञानजाहलियाबुद्धिव्हावी तैशी ॥ ब्रह्मात्माआपणम्हणोनी ॥ ६९ ॥ जागृतीचेदशधाव्यापार ॥ होतातिदेहा-चेजैसाकोणीपर ॥ त्याचेंमीपणस्फुरेनाअणुमात्र ॥ आपणब्रह्मात्मास्वयें ॥ ७० ॥ हें असोस्वप्नींस्वप्नभासातें ॥ मीम्हणूनस्फुरेनादेहातें ॥ लयसाक्षित्वजेंसर्वांपरतें ॥ तें स्वयेंनिश्चयजाहला ॥ ७१ ॥ सुप्तीमाजींतोंदेहाचीविस्मृति ॥ परीनिश्चयेंजाणतसे नेणिवेप्रती ॥ समाधिघेतांहीसुखानुभूति ॥ अनुभवितामीनस्फुरे ॥ ७२ ॥ असोभ-लतैसेव्यापारदेहाचे ॥ वर्तणेंघडोशुभाशुभकर्माचें ॥ परीमीह्मणूनययासंघाचें ॥ गु-प्तहीस्फुरणनसे ॥ ७३ ॥ मीब्रह्मात्मानिश्चयसदृढ ॥ वृत्तीनेंखलूनजाहलाअतिदृढ ॥ जैसाइतरांसीदेहाचामीपणावाड ॥ निश्चयबैसलाबुद्धीसी ॥ ७४ ॥ देहात्मनिश्चय-चिजयासी ॥ तोकदांमीह्मणेनाअन्यासी ॥ तैसाब्रह्मात्मानिश्चयजयाज्ञात्यासी ॥तो देहादिकांमीह्मणेना ॥ ७५ ॥ ऐशियेदेहात्मबुद्धीचेपरी ॥ ब्रह्मात्मबुद्धिजाहलीखरी॥ भलतैसेहीदेहाचेव्यापारीं ॥ देहात्मबुद्धिनव्हे ॥ ७६ ॥ ऐशीदृढताजेहोणेंतत्त्वतां ॥ हेचिसाफल्यतागारविदत्ता ॥ यथार्थचिजाहलीकृतकृत्यता ॥ प्राप्यतेंप्राप्तजाहलें ॥ ॥ ७७ ॥ जाहलीसाधनाचीपराकाष्ठा ॥ कांहींउरलीनाहींकृतीचीक्लिष्टा ॥ चरमस्थि-तिप्राप्तजाहलीस्पष्टा ॥ जेभूतभविष्यज्ञात्याची ॥ ७८ ॥ नवतेंतेंजन्ममरणचुकलें ॥ लटिकेबंधनपाशगळाले ॥ भवभयमृगजळवत्तेंआटलें॥ धोकास्थाणुपुरुषमेला॥७९॥ अजन्माचाचुकलाजन्म ॥ अमराचामरोनिगेलायम ॥ निष्कर्माचेंतुटलेंकर्म ॥संचि-

तत्क्रियमाणप्रारब्ध ॥ ८० ॥ अज्ञानमायारूपभुली ॥ खपुष्पवततेजीवेंमेली ॥ तिची संततितेहीनिमाली ॥ विद्याविद्यारूप ॥ ८१॥ जीवशिवप्रतिभासतेहारपले ॥ कींप्रतिबिंबमुख्यात्मत्वींमीनलें ॥ सर्वसृष्टीचेकर्तेभोक्तेमेले ॥ आतांउत्पत्तिस्थितिकैंची ॥ ॥ ८२ ॥ असंगासीकेलेंअसंग ॥ अभंगासीकेलेंअभंग ॥ अरोगियाचागेलारोग ॥ ज्ञानमात्रामीनतां ॥ ८३ ॥ अज्ञानतमींआत्मासूर्य ॥ पडिलाहोताद्वैतींअद्वय ॥ त्याचेनिजप्रकाशाचादाऊनिप्रत्यय ॥ काढिलापावेस्वस्थळा ॥ ८४ ॥ ऐशीकृतकृत्यता खरीजाहली ॥ पावावयाचीतेस्थितिलाधली ॥ वरुतीदेहाचीक्रीडातेअसेबोलिली ॥ जीवन्मुक्तदशा ॥ ८५ ॥ तयाचादेहवर्ततेभलतैसा ॥ अमुककरणेंहाविधिनसेसहसा ॥ अमुकनकरणेंहानिषेधआमासा ॥ नसेतयाप्रती ॥ ८६ ॥ तोकरीलतोचिविधित्याचा ॥ नकरीलतोचिनिषेधसाचा ॥ तयासीनेमकरीलऐसावेदाचा ॥ बडिवारनसे ॥ ॥ ८७ ॥ तोनियमकवणासीअसेना ॥ प्रेरकाचाहीप्रेर्यहोईना ॥ वहुतकासयासीहो वल्गना ॥ काळासीहीनगवसे ॥ ८८ ॥ ब्रह्मात्मयाकोठेंअसेकाळ ॥ तोचिकाळाचाहीमहाकाळ ॥ तथापिदेहाचाअंतजोहोणेंबरळ ॥ तोप्रारब्धक्षयींहोईल ॥ ८९ ॥ ॥ पद ॥यदातदायंम्रियतां ॥ ज्याक्षणींप्रारब्धकर्मविघडे ॥ त्याक्षणींदेहाचेंपडेमढें ॥ तेव्हांहामरेनाकांसांकडें ॥ असेब्रह्मात्मयाकेवीं ॥ ९० ॥ कल्पवरीकर्मवशेंराहिला ॥ कींआजाचिकर्मक्षयेंमेला ॥ तरीसंबंधकायअसेतयाला ॥ जोनिजांगेंब्रह्म ॥ ९१ ॥ जैसेंआकाशींचियेसूर्याप्रती ॥ मृगजलआटलेंकींआलीभरती ॥ हासंबंधनसेयेणेंचि

रीतीं ॥ देहादिकब्रह्मात्मया ॥ ९२ ॥ पाहिजेतेव्हांकर्महेंसरो ॥ पाहिजेतेव्हांप्राण-
वियोगेंमरो ॥ अथवाचिरकाळकर्माधारेंवावरो ॥ शेवटींमहाकल्पींजळो ॥ ९३ ॥
परीब्रह्मात्माजोनिजांगें ॥ अनिर्वाच्यासंचलाअभंगें ॥ तयासीहींनस्पर्शतीसोंगें ॥
जेअज्ञानजनित ॥ ९४ ॥ देहहाकेवळप्रारब्धाधीन ॥ कर्मतोंवरीहोयवर्तन ॥ कर्म
सरतांचिपावेलमरण ॥ असोमरेतेव्हांमरो ॥ ९५ ॥ कर्मपाहतांत्रिधाप्रकारें ॥ त्यां-
तज्ञानजाहलियाद्वयवोसरे ॥ तिजेंप्रारब्धदेहासीउरे ॥ तेंहीसरेभोगोनी ॥ ९६॥अ-
परोक्षज्ञानजेधवांजाहलें॥तेधवांचिसंचितनिपटूनजळालें ॥जैसेंजागेंहोतांचिस्वप्नमा-
वळलें ॥ भासलेंजेंशुभाशुभ ॥ ९७ ॥ कर्तेपणाजरीउद्भवेना ॥ तरीव्यर्थत्वयेतसेंक्रि-
यमाणा ॥ तथापिघडेजेंशुभाशुभनाना ॥ त्याचेविभागीकेले ॥ ९८ ॥ ज्ञातयानेंजें
शुभाशुभकरावें ॥ प्रारब्धानुकारेंबळेंघडावें ॥ त्याचेंअकर्तेपणेंसंचितनव्हे ॥ तेंभोगा
यावेंदोघांच्या ॥ ९९ ॥ ज्ञात्यासीनिंदितीगांजिती ॥ व्यर्थदुराग्रहेंहेळसिती ॥ ते
पापाचेवांटेकरीहोती ॥ ज्ञाताअकर्ताअलेप ॥ ५५०० ॥ जेस्तवितीपूजितीएकभावें॥
सदांप्रवर्तलेअसतीसेवे ॥ तयांसीज्ञात्याचेंपुण्यजेंआघवें ॥ प्राप्तहोतसे ॥ १ ॥
ऐसाश्रुतीनेंनेमाचिकेला ॥ विभागीज्ञात्याचेपापपुण्याला ॥ संबंधनाहींज्ञातयाला ॥
क्रियमाणाचा ॥ २ ॥ एवंसंचितक्रियमाणदोनी ॥ ज्ञातयाचेंगेलेनिपटुनी ॥ प्रारब्ध-
मात्रतयालागुनी ॥ भोगार्थउरलें ॥ ३ ॥ तेंहिअज्ञानजनाचेबोधास्तव ॥ उरलेंसेंश्रु-
तिसांगेगौरव ॥ कींअरेमूर्खहोज्ञात्याचेंवर्तणेंजेंअपूर्व ॥ शेषप्रारब्धामुळें ॥ ४ ॥ येन्ह-

वींज्ञातातोनव्हेदेहादिक ॥ तोकेवळानिजांगेंब्रह्मएक ॥ तेथेंप्रारब्धाचाकैंचाकुतर्क ॥ स्थापावयाअन्यासी ॥ ५ ॥ तयाज्ञातयासीश्रुतिसांगे ॥ अशेषकर्मांनाशजालावेगें ॥ बहुवचनेंत्रिविधाहीप्रसंगें ॥ भस्मोनिगेलें ॥ ६ ॥ देहमात्रउरलाअसेह्मणोनी ॥ प्रारब्धास्तवबोलिलेंवचनीं ॥ हेंहीमुमुक्षूचेंभाग्यउदेलेंगगनीं ॥ उपदेशास्तवउरले ॥ ॥ ७ ॥ जरीसुखदुःखेंदेहाघडती ॥ तरीकायउणीवताज्ञानाप्रती ॥ आपेंआपभोगदेऊनमावळती ॥ तरीबाधकायउरतां ॥ ८ ॥ प्रारब्धेंदेहासीभोगद्यावे ॥ ज्ञानासीनासावयासामर्थ्यनव्हे ॥ मिथ्याबाहणेंतेंहीननासावें ॥ तरीज्ञानाविरोधीनसे ॥ ९ ॥ ज्ञानहीप्रारब्धकर्मासी ॥ विरोधीअसेनास्वभावेंसी ॥ ह्मणोनिप्रारब्धातेंननाशी ॥ तस्मात्भोगूनसरे ॥ १० ॥ ऐसापरस्परेंअविरोधदोहींचा ॥ यापरीनिश्चयअसेज्ञातयाचा ॥ ह्मणोनिघातकरितीनाप्रारब्धाचा ॥ भूतभाविज्ञाते ॥ ११ ॥ आणिभोगिल्याविणहीनसरे ॥ ऐसेंजाणोनियांविचारें ॥ उगेवर्ततीप्रारब्धानुकारें ॥ आग्रहत्यागुनी ॥ १२ ॥ ऐसेंअसतांकोणीअविचारी ॥ प्रारब्धनासावेंइच्छीअंतरीं ॥ तरीकाय तोशाहणाजाहलात्यावरी ॥ मागीलकायसर्वेवेडे ॥ १३ ॥ तस्मात्साधकेंआग्रहत्यागुनी ॥ प्रारब्धेंवर्तावेंसुखेंजनीं ॥ सर्वसरतांचिदेहपावेमरणीं ॥ तेव्हांविदेहकैवल्या मिळे ॥ १४ ॥ ह्मणसीप्रारब्धाचेप्रकारतीन ॥ इच्छितांनइच्छितांपरापेक्षेंकडून ॥ भोगघडतीत्यांतअबाधकदोन ॥ परीइच्छूनभोगणेंबाधक ॥ १५ ॥ तरीयाचेंउत्तर अवधारावें ॥ इच्छूनभोगीतरीबाधकनव्हे ॥ कायसत्यत्वेंस्थापिलेंभोग्यआघवें ॥

कींभोक्ताखराजाहला ॥ १६ ॥ जरीमिथ्यासीसत्यत्वस्थापिलें ॥ अथवाभोक्तेपणस-
त्यत्वेंउद्भवलें ॥ तरीमगजाणावेंबाधकजाहलें ॥ इच्छारूपहीकर्म ॥ १७ ॥ चिदचिद्
ग्रंथिजेधवांतुटली ॥ तेधवांचिभोक्तेपणाचीमुळीखांदिली ॥ आणिसर्वांसीमिथ्यतास-
दृढजाहली ॥ सत्यताकल्पांतींनये ॥१८॥ भोक्ताठाईंचीउद्भवेना ॥ सत्यताभोग्यासी
संभवेना ॥ तरीमगकोटिइच्छाकांकरीना ॥ तेइच्छाचिनव्हे ॥ १९ ॥ असो
इच्छितांकींनइच्छितां ॥ अथवाभोगघडतीपरापेक्षता ॥ तेसुखेंघडोतदेहासीआतां॥
ज्ञातयासंबंधनाहीं ॥ २० ॥ ऐसेकर्मेंकडूनदेहवर्तत ॥ तरीसुखेंवर्तोक-
ल्पपर्यंत ॥ अथवाआजचिकर्माचाहोऊनघात ॥ मरणपावो ॥ २१ ॥ तोमृत्युहीहो-
वोभलतेस्थळीं ॥ सुक्षेत्रींकींकुग्रामींलेंडवोहळीं ॥ येकटाकिंवाबहुस्वजनमंडळीं॥ दि-
वाकिंवारात्रीं ॥ २२ ॥ देहहाकाश्यादिक्षेत्रींपडावा ॥ उत्तरायणींशुक्लपक्षदिनअसा-
वा ॥ स्मरणकरीतसमुदायांतमरावा ॥ हेंअज्ञानाचेंमत ॥ २३ ॥ पहापहाजनकैसे
आंधळे ॥ म्हणतीपिंडासीशिवलेजरीकाउळे ॥ तरीचतोउत्तमगतीसीमिळे ॥ ना-
तरीअधमगति ॥ २४ ॥ असोजनाचेअनुभवपाहतां ॥ ज्ञात्यासीविरोधचितत्त्वतां ॥
आणिग्रंथासीविस्तारबहुतां ॥ प्रकारेंजाहला ॥ २५ ॥ म्हणोनिअन्यकांहींनुच्चारि-
तां ॥ ज्ञात्याचाअनुभवजोतत्त्वतां ॥ बोलावासाधकासंशयाचीवार्ता ॥ नुरावीया-
स्तव ॥ २६ ॥ जयासीस्वर्गांप्रतिजाणे ॥ उत्तरायणदिनशुक्लपक्षअपेक्षावेतेणें ॥ ज्ञा-
तास्वरूपींस्वरूपतरीहोणें ॥ इत्यादिकासया ॥ २७ ॥ उपासकसालोक्यादिइच्छि-

ती ॥ म्हणोनिअंतींदेवासीस्मरती ॥ हानिजांगेंदेवाचादेवतरीअंतीं ॥ कवणास्मरावें ॥ २८ ॥ सत्यलोकादिवासइच्छूनी ॥ योगीजातीब्रह्मरंध्रभेदोनी ॥ पूर्णब्रह्मनिजांगें ज्ञानी ॥ तरीप्राणउत्क्रामतीना ॥ २९ ॥ आणीकजनाच्यानानाकल्पना ॥ काश्यादि क्षेत्रींपावावेंमरणा ॥ इत्यादिनलगेवाउग्यावल्गना ॥ अज्ञानाच्याज्ञानिया ॥ ३० ॥ ज्ञात्याच।देहभलतेहीदेशीं ॥ भलत्यानिमित्तेंभलतेसमयासी ॥ पडोप्रारब्धाचीगति जैशी ॥ परीतोनिश्चयेंसीमुक्त ॥ ३१ ॥ असोमृत्युतयाचाभलतैसा ॥ परीवर्तणुकी-चाप्रकारअसेजैसा ॥ शुभकींअशुभवर्ततांसहसा ॥ विकल्पनकरावाकोणें ॥ ३२ ॥ पद ॥ मुक्तोनास्त्यत्रसंशयः ॥ ॥ तयाचासदाचारकींदुराचार ॥ पाहोंनयेभलतैसाविहार ॥ तोमुक्तयेविशींसंशयअणुमात्र ॥ नसावासहसा ॥ ३३ ॥ जयाचाग्रंथिभेदख-राजाहला ॥ अभ्यासेंअभिन्नत्वींसमरसला॥मीपणनस्फुरेभलतेअवस्थेला॥जयासीदे-हजाहलापरोक्ष ॥ ३४ ॥ देहात्मबुद्धीचियेपरी ॥ ब्रह्मात्मबुद्धिजाहलीखरी ॥ तया-चीक्रियाजरीयथेष्टाचारी ॥ परीतोमुक्तनिःसंशय ॥ ३५ ॥ यथेष्टाचारींजरीतोवर्ते ॥ परीनाचरेकदाप्रारब्धापरतें ॥ अथवासदाचरणहीलोकरीतीतें ॥ घडेप्रारब्धानुसार ॥ ३६ ॥ असोदेहवर्तोभलतैसेपरी ॥ सदाचरणींकींदुराचारीं ॥ परीतोमुक्तनिःसंश-येंअंतरीं ॥ साधकेंवोळखावा ॥ ३७ ॥ ज्ञानियासीतोसंशयअसेना ॥ तेनपाहती कवणाचेहीआचरणा ॥ मगअभ्यासेंपावलाजोअभिन्नज्ञाना ॥ त्याचेंआचरणकेवीं पाहती ॥ ३८ ॥ ह्मणोनिसाधकाप्रतिसांगितलें ॥ कींदेहात्मवत्ब्रह्मात्मत्वजाहलें ॥

तयाचेंवर्तणेंअशुभकिंवाभलें ॥ परीतोमुक्तनिःसंशयें ॥ ३९ ॥ तयाचेआचरणावरू-
नी ॥ उणीवतामानीलसाधककोणी ॥ तरीतयाचीचहोईलहानि ॥ दृढापरोक्षानपावे
॥ ४० ॥ म्हणोनिसाधकासीचसांगितलें ॥ कींसंशयनकरावाठाईंआपुले ॥ जयांचें
ग्रंथींचेंभेदनखरेंजाहलें ॥ तेहीमुक्तहोती ॥ ४१ ॥ येरजेअज्ञानीसदांभ्रांत ॥ दे-
हात्मबुद्धीचेठाईंरत ॥ तयाप्रतिबोलिलेंतरीजात ॥ व्यर्थचिअवघें ॥ ४२ ॥ ते
तयाचेंआचरणचिपाहती ॥ शुभतरीवाहवावाहवाम्हणती ॥ अशुभतरीउगेंनाकमो-
डिती ॥ परीनपाहतीआपुलीक्रिया ॥ ४३ ॥ आपणतरीभलतैसेंवर्तावें ॥ परीअन्या-
प्रतिनांवठेवावें ॥ शास्त्रसंपन्नजरीअसावें ॥ परंतुहेचिरीतीसर्वांची ॥ ४४ ॥ ऐमेजे
भ्रांतअज्ञानलोक ॥ तयांसीकायकळेअंतरविवेक ॥ देहाचीचपाहतीवर्तणूक ॥ शु-
भअथवाअशुभ ॥ ४५ ॥ पूर्णज्ञात्याचीनिंदाकरिती ॥ साधकमुमुक्षूसीहेळसिती ॥
म्हणतीपापीजन्मलेभूमीवरुती ॥ यांचीगतिकायनेणों ॥ ४६ ॥ ऐसाद्रोहचिअंतः-
करणा ॥ गांजितीभलत्याकरितीवल्गना ॥ तरीतयाच्यावाणीसीकींमना ॥ कोणें
अर्गळाघालावी ॥ ४७ ॥ असोतयाप्रतिकाजकाय ॥ द्रोहेंउत्तमगतीचाहोवोक्षय ॥
परीसाधकेंअसावेंनिःसंशय ॥ कींज्ञातामुक्तसर्वदा ॥ ४८ ॥ जैसाआकाशामाजींवृ-
क्षविरूढला ॥ कोणीएकपुरुषत्यावरीबैसला ॥ तोवृक्षकवणेंसमूळउपडिला ॥ तोप-
डेलभूमीवरी ॥ ४९ ॥ त्यावृक्षासीचभूमीपरतीगति ॥ नाहींनाहींबापाकल्पांतीं ॥
मातोपुरुषराहेलगगनींनिश्चितीं ॥ हेंकेवींघडेल ॥ ५० ॥ हाचिदृष्टांतपहाविवरून॥

मायाद्वैतरूपीशून्यगगन ॥ कांहींआधारनसतांदेहवृक्षाविस्तीर्ण ॥ वाढलाअपार ॥ ॥ ५१ ॥ अज्ञानाचेंआळेंकेलें ॥ त्यांतकल्पनेचेंजळभरिलें ॥ कर्मवासनेचेंबीजपेरि- लें ॥ तेंव्हांदेहवृक्षसरसावला ॥ ५२ ॥ तयावृक्षाचीपरिपक्वता ॥ हेचिउद्भवलीखरी मुमुक्षुता ॥ सद्गुरुसच्छास्त्रतयामीनतां ॥ आयुष्यत्याचेंसरलें ॥ ५३ ॥ सद्गुरूनेंस- च्छास्त्रकुठारीघेऊन ॥ याचेमुमुक्षुतेचादांडाबैसवून ॥ विवेचनघावघातिलायोजून ॥ तेणेंदेहवृक्षउन्मळला ॥ ५४ ॥ अज्ञानआळेंनिःशेषफोडिलें ॥ वासनासमूळबीजउ- पडिलें ॥ मीपणाचेंजुंबाडेंहोतेंगुंतलें ॥ तेंखांदिलेंअभ्यासें ॥ ५५ ॥ ऐसादेहवृक्षनि- राधारजाहला ॥ तोमायागगनींनराहेस्थिरावला ॥ वरीजीवरूपेंहापुरुषबैसला ॥ तरीतोद्वैतींराहेकेवीं ॥ ५६ ॥ ब्रह्मात्माहेनिजकैवल्यभूमी ॥ येथेंचियेऊनपडेलअनु- क्रमीं ॥ ह्मणिजेदेहाचीक्रीडातेसंभ्रमीं ॥ खरीजीवन्मुक्तदशा ॥ ५७ ॥ ऐसादेहवृ- क्षकवल्यातेंपावला ॥ तरीकेवींगतिहोयअन्यजीवाला ॥ अभिन्नज्ञानेंस्वरूपींसमर- सला ॥ हेचिकैवल्यमुक्ति ॥ ५८ ॥ जैसावृक्षासहितपुरुषभूमींवरी ॥ तुटूनपडेन स्थिरेअंबरीं ॥ तैसाज्ञाताअभिन्नभक्तिमुक्तीवरी ॥ सदेहजीवपुरुष ॥ ५९ ॥ वृक्षतु- टोनिभूमीवरीनपडे ॥ ऐसासंशयनुद्भवेचिकोडें ॥ तैसाचिनसावाजयासीजोडे ॥ अभिन्नज्ञान ॥ ६० ॥ येथेंसंशयसहसानकरावा ॥ ज्ञानेंमुक्तजाहलाअसेबरवा ॥ दे- हाचाआचारअसेनास्वभावा ॥ प्रारब्धानुकारें ॥ ६१ ॥ देहात्मबुद्धीचियेसमान ॥ ब्रह्मात्मबुद्धिदृढजाहलीपूर्ण ॥ हेंचिबापादृढअपरोक्षज्ञान ॥ निःसंशयेंजाहलें ॥ ६२ ॥

अगारविदत्तामंदकींतीव्रतर ॥ अभ्यासेंकींसूक्ष्मविचार ॥पावलेजेव्हांअपरोक्षनिर्विकार ॥ आतांभेदनुरेकिंचित ॥ ६३ ॥ हापहिलाअभिन्नतेसीपावला ॥ हासंदिसात्यास्थितीसआला ॥ ऐसाभेदकिमपिनजायउरला ॥ मुक्तस्थितीसमान ॥६४॥ तस्मात्तुजशींविवेचनजाहलें ॥ लयसाक्षित्वज्ञानहींठसावलें ॥ त्यावरीअभ्यासेंखलणेंनिरोपिलें ॥ आतांउठींकरींतैसें ॥ ६५ ॥ अवधीहीविश्वतैजसादिकांची ॥ सांगितलीनिपटूनगेलियाची ॥ तोंवरीअभ्यासकरूनीअपरोक्षाची ॥ दृढतासंपादावी ॥ ॥ ६६ ॥ देहाचीवर्तणूकअसोभलतैसी ॥ हेपाहोंचिनकोसोडूनअभ्यासासी ॥ पात्रशीलपूर्णसमाधानसहजस्थितीसी ॥ आमुचेआशीर्वादें ॥ ६७ ॥ ऐशीआज्ञावदोनिस्वामी ॥ निवांतठेलेअंतर्यामीं ॥ सअभ्यासनिरूपणअनुक्रमीं ॥ आकळिलेंरविदत्तें ॥६८॥ आनंदेंटाळीपिटूनियां ॥ मस्तकींआज्ञावंदोनियां ॥ साष्टांगनमितसेपायां॥ वारंवारप्रदक्षिणा ॥ ६९ ॥ पुन्हांसाष्टांगपुन्हांप्रदक्षिणा ॥ आनंदाश्रुभरलेनयना ॥ बहुप्रकारेंकरूनिस्तवना ॥ मागीलचरणानिघाला ॥ ७० ॥ प्रारब्धानुकारेंदेहवर्ते ॥ परीस्मरेनादुजेंलयसाक्षीपरतें ॥ भलतेअवस्थेसीनामरूपहेंतें ॥ उद्धवूंनेदीसहसा ॥ ७१ ॥ ऐसाचिरकाळअभ्यासकरूनी ॥ निर्दाळिलेतिन्हीअभिमानी ॥ पावलापूर्णसमाधानी ॥ जेचरमास्थितिज्ञात्याची ॥ ७२ ॥ ऐसामंदाधिकारीरविदत्त ॥ अभ्यासद्वाराजाहलामुक्त ॥ सहजास्थितीनेंअसेवर्तत ॥ भूतभविष्यज्ञात्यापरी ॥ ७३ ॥ हेंऐसेंवाक्यवृत्तीचेंनिरूपण ॥ आकळूनआचार्यगुरूपासून ॥ अभ्यासविचारेंहोतीपा-

वन ॥ रविदत्ताऐसेबहु ॥ ७४ ॥ श्रोतेसाधकमुमुक्षुअधिकारी ॥ तीव्रप्रज्ञकींमंद-
प्रज्ञअंतरीं ॥ परीजयांतरावेंऐशीआवडीखरी ॥ तेतरतीअभ्यासें ॥ ७५ ॥ येथेंको-
णीएकरविदत्तअसे ॥ कोणीएकआचार्याचेकृपेसरिसें ॥ पावलासमाधानपरोक्षऐ-
सें ॥ सहसामानूंनये ॥ ७६ ॥ जयासीवास्तविकअधिकारप्राप्त ॥ तोचिआपणकीं
स्वयेंरविदत्त ॥ उपदेष्टागुरुतोचिविख्यात ॥ शंकराचार्यस्वामी ॥ ७७ ॥ निजगुरू-
चीजेसहजवचनोक्ति ॥ हेवेदांतसारवाक्यवृत्ति ॥ आकळोनियांसर्वसअभ्यासयुक्ति॥
वृत्तीनेंखलकरावा ॥ ७८ ॥ विवेचनयथासांगकरावें ॥ अभ्यासेंसविकल्पनिर्विक-
ल्पसाधावें॥पूर्णविचारेंलयसाक्षित्वआणावें ॥ स्वानुभवेंप्रतीतीसी ॥ ७९ ॥ पुढेंदेह-
बुद्धीचीक्षीणताव्हावया ॥ अभ्यासेंवृत्तीचाखलकरोनियां ॥ तिन्हीअभिमानांतेंव-
धोनियां ॥ पावावेंसहजास्थितीसी ॥ ८० ॥ ऐसाचिअनुक्रमसाधोनी ॥ जोमुमुक्षु
आदरीलअंतःकरणीं ॥ तोमुक्तहोईलानिःसंशयपणीं ॥ येथेंसंदेहनाहीं ॥ ८१ ॥ हे
वाक्यवृत्तिवेदांतसार ॥ असेतोकैसाऐकाप्रकार ॥ सर्वसारांशरूपवाक्येंचार ॥ च-
हूंवेदांचीं ॥ ८२ ॥ प्रत्यगात्माचिब्रह्मपरिपूर्ण ॥ हाचिसारार्थचहूंमाजींगहन ॥ तो-
चिअर्थअष्टादशश्लोकेंकडून ॥ विवेचनअभ्यासेंबोलिला ॥ ८३ ॥ हाअर्थवेदांतर-
हस्याचा ॥ लोपलाहोताआजवरीसाचा ॥ वाउगाचिगलबलाजाहलापरोक्षाचा ॥
नानामतेंवाढलीं ॥ ८४ ॥ हेंसदाशिवेंपूर्णपाहोनी ॥ अवतारधरिलामानवीजनीं ॥
नानामतेंसर्वहीखंडोनी ॥ वेदांतप्रतिपादिला ॥ ८५ ॥ शारीरभाष्यगीताभाष्य ॥

मुख्यसारउपनिषद्भाष्य ॥ ऐसेंप्रस्थानत्रयसरहस्य ॥ वाक्यार्थांचेंकाढिलें ॥ ८६ ॥ परीतेसमुद्राऐसेग्रंथथोर ॥ कवणआकळितीलमंदनर ॥ म्हणोनिआदिकरूनीसदा-चार ॥ सुलभग्रंथकेले ॥ ८७ ॥ सानग्रंथम्हणोनीकधीं ॥ अर्थसाननव्हेत्रिशुद्धि ॥ वाक्यार्थरूपचहूंवाक्यांचीप्रसिद्धि ॥ सर्वांमाजींसारिखी ॥ ८८ ॥ त्यामाजींहीलघु वाक्यवृत्ति ॥ चहूंमहावाक्यांचीसारअनुभूति ॥ विवेचनआणिअभ्यासरीतीं ॥ ब-हुस्पष्टयेथेंअसे ॥ ८९ ॥ इतरसदाचारआत्मबोधादि ॥ उत्तमअधिकारियाज्ञानासि-द्धि ॥ परीमंदअधिकारियाचीबुद्धि ॥ येथेंपवाडे ॥ ९० ॥ तस्मात्हेवाक्यवृत्तिअति-सुलभ ॥ मंदप्रज्ञासीहीअलभ्यलाभ ॥ कारणकींअभ्यासद्वारास्वप्रभ ॥ निजांगेंब्र-ह्महोती ॥ ९१ ॥ अभ्यासआणिविवेचन ॥ केवळस्पष्टअसेपरिपूर्ण ॥ अष्टादशश्लो-कहीसघन ॥ ब्रह्मात्मरसेंभरले ॥ ९२ ॥ अठराश्लोकींहीसारसंकलित ॥ वाक्यार्थ असेविस्तारेंविणगुप्त ॥ तोहीनिघेनामंदजयाचेंचित्त ॥ म्हणोनिप्राकृतींविस्तारिलें ॥ ९३ ॥ वटबीजतरीअल्पप्राय ॥ परीविस्तारहोतसेशाखाविटपमय ॥ तैसाचिअ-ठराश्लोकांचाअभिप्राय ॥ विस्तीर्णजाहलाप्राकृतीं ॥ ९४ ॥ प्राकृतभाषेंतआलाजरी ॥ तरीअर्थानव्हेसानथोरपरी ॥ तोअनादिजैसातैसानिर्विकारी ॥ तयाहेळसीकव-ण ॥ ९५ ॥ सुवर्णाचेजरीनगकेले ॥ वरीभूषणार्थव्याघ्रसिंहकाढिले ॥ तरीतेंसुवर्ण नवचेउणेंजाहलें ॥ परीक्षवंतजाणती ॥ ९६ ॥ तैसाअर्थजोसंस्कृताचा ॥ तोचिप्रा-कृतींविस्तारलासाचा ॥ हेंजाणतीज्ञातेअन्ययेरांचा ॥ भावअसोभलतैसा ॥ ९७ ॥

प्राकृतभाषारूपसुवर्णनगीं ॥ अठराश्लोकरत्नेंजडलींअभंगीं ॥ हेसुशोभितहोतील गुरुपुत्रालागीं ॥ शंकरस्वामीचेप्रसादें ॥ ९८ ॥ शकेसत्राशेंएकाहत्तरीं ॥ सौम्यनामकसंवत्सरीं ॥ आश्विनशुक्लसौम्यवासरीं ॥ विजयादशमीसीसंपुर्ण ॥ ५५९९ ॥ आकाशगगनरसबाण ॥ इतुकेंप्राकृतवोवीचेंगणन ॥ श्लोकतरीनागधरापूर्ण ॥ संख्याप्रसिद्ध ॥ ५६०० ॥ इतिश्रीशंकराचार्यउक्ति ॥ अष्टादशीलघुवाक्यवृत्ति ॥ विस्तारेंकथिलीअसेप्राकृतीं ॥ टीकापदबोधिनी ॥ ५६०१ ॥ इतिवाक्यवृत्तिःसमाप्ता ॥ ॥ श्रीमत्सद्गुरुचरणारविंदार्पणमस्तु ॥ ॥ ॥ ॥ ॥

## आरती वाक्यवृत्तीची.

जयदेवी वाक्यवृत्ति ॥ देशी ब्रह्मात्मप्रतीति ॥ अज्ञान निरसूनी ॥ पावविशी स्वयंज्योति ॥ ध्रु० ॥ वाक्यवृत्ति दृढाभ्यास ॥ महावाक्य उपदेश ॥तेथीळ गूढार्थांचा ॥ प्रगटाचि जो सारांश ॥१॥ज०॥व्यर्थचि जीव भ्रमले ॥ निजरूपा विसरले ॥ सावध त्यांशीं करूनी ॥ दुःख विक्षेप वारिले॥२॥ज०॥आचार्य शंकरोक्ति॥वरीहंसराजकृति ॥ सुबोध टीका तेणें ॥ अगणित उद्धरती ॥ जयदेवी वाक्यवृत्ति ॥ दे० ॥३ ॥

आरती समाप्त.

हा वाक्यवृत्ति नामक ग्रंथ पुणें येथें रावजी श्रीधर गोंधळेकर यांनीं आपल्या 'जगद्धितेच्छु' छापखान्यांत छापिला. मित्ती चैत्र शुद्ध १ रोज शनिवार शके १८१६ जयनामसंवत्सरे. आवृत्ति २ री.